**मा.राज्यपाल यांच्याकडून राज्याच्या अनुसूचित क्षेत्रात महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ च्या कलम ३६ अ (१) च्या मध्ये करण्यात आलेल्या सुधारणेनुसार अनुसूचित क्षेत्रातील जमिनींच्या संदर्भात आदिवासी व्यक्तींचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरित करण्यापूर्वी गावाच्या ग्रामसभेची मान्यता घेण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः जमीन-२०१६/प्र.क्र.११८/ज-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक : ०६ जानेवारी, २०१७**

वाचा :-

१) मा.राज्यपाल महोदय यांनी निर्गमित केलेली व राजपत्रात प्रसिध्द झालेली अधिसूचना क्र.आरबी/डीबी/ई-११०१९(८९)(२०१३)/८५०/२०१६, दि. १४ जून,२०१६

२) मा.राज्यपाल यांचे सचिव यांचे अ.शा.पत्र क्र.आरबी/टीसी/ई-११०१९(८९)(२०१३)/नोटीफी-१४ जून २०१६/८९१, दि. २७ जून, २०१६

शासन परिपत्रक :-

संदर्भाधीन क्र.१ वरील अधिसूचनेन्वये मा. राज्यपाल महोदय यांनी भारतीय राज्य घटनेच्या पाचव्या अनुसूची मधील परिच्छेद क्रमांक ५ (१) मधील प्राप्त अधिकारानुसार असे निर्देशित केले आहे की, महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ मधील कलम ३६-अ ची तरतूद राज्यातील अनुसचित क्षेत्रात खालील सुधारणांसह लागू होईल :-

(i) कलम ३६-अ च्या पोटकलम (१) खालील पहिल्या परंतुकानंतर पुढील प्रमाणे नवीन परंतुक समाविष्ट करण्यात येईल -

***"राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील गावांमध्ये ग्रामसभेची मंजूरी मिळाल्याशिवाय आदिवासी व्यक्तींचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरणीत करण्यास जिल्हाधिकारी यांनी मंजूरी देऊ नये"***

(ii) त्याचप्रमाणे कलम ३६-अ च्या पोटकलम (४) मध्ये, ***"वहिवाटीमध्ये हितसंबंध असणाऱ्या"*** या शब्दानंतर "किंवा अनुसूचित क्षेत्रामध्ये ग्रामसभेचा ठराव " हे शब्द समाविष्ट करण्यात येतील.

सदर अधिसूचना संदर्भाधीन क्र.१ येथे नमूद शासन राजपत्र असाधारण भाग-८ मध्ये दि. १४ जून, २०१६ रोजी प्रसिध्द करण्यात आली आहे व सदरहू अधिसूचना संदर्भाधीन क्र. २ येथे नमूद दि. २७ जून, २०१६ रोजीच्या पत्रान्वये शासनाकडे प्राप्त झाली आहे.

या पार्श्वभूमीवर, उक्त आधिसूचनेतील निर्देशांना अनुसरुन राज्यातील अनुसूचित क्षेत्रातील भागांमध्ये आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरणीत करण्याच्या प्रकरणांमध्ये तदनुरुप कार्यवाही सुनिश्चित करण्याच्या उद्देशाने क्षेत्रीय स्तरावरील महसूल प्राधिकारी/अधिकारी यांना पुढीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत :-

(१) महाराष्ट्र जमीन महसूल संहिता,१९६६ च्या कलम ३६ व ३६ अ मधील तरतूदीनुसार आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीकडे हस्तांतरणीत करण्याच्या ज्या प्रकरणामध्ये शासन स्तरावरुन मंजूरी देण्यात आली आहे तथापि, जिल्हाधिकारी स्तरावर अशा मंजूरी दिलेल्या प्रकरणामध्ये दि. १४ जून, २०१६ पूर्वी अंतिम आदेश निर्गमित करण्यात आले नसतील तर अशी प्रकरणे प्रथम संबंधित गावाच्या ग्रामसभेच्या मंजूरीकरीता पाठविण्यात यावी. या प्रकरणातील आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीस हस्तांतरणाच्या व्यवहारास ग्रामसभेचा मंजूरीचा ठराव प्राप्त झाल्याशिवाय कोणतीही पुढील कार्यवाही करण्यात येऊ नये.

(२) ज्या आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीस हस्तांतरीत करण्यासंदर्भातील प्रकरणामध्ये दि. १४.६.२०१६ नंतर शासन स्तरावरुन मंजूरी प्राप्त झालेली आहे, अशा प्रकरणामध्ये देखील उपरोक्त (१) प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(३) यापुढे संबंधित जिल्हाधिकारी यांनी त्यांच्याकडे आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीस हस्तांतरीत करण्यासंदर्भातील प्राप्त होणाऱ्या प्रकरणामध्ये प्रकरणनिहाय संबंधित गावाच्या ग्रामसभेच्या मंजुरीचा ठराव प्राप्त झाल्याशिवाय पुढील कोणतीही कार्यवाही करु नये.

(४) तसेच आदिवासी व्यक्तींच्या जमिनीचा भोगवटा बिगर आदिवासी व्यक्तीस हस्तांतरीत करण्यासंदर्भातील विभागीय आयुक्त अथवा शासन स्तरावर दाखल असलेल्या व निर्णयार्थ प्रलंबित असलेल्या प्रकरणांच्या बाबतीत संबंधित गावाच्या ग्रामसभेच्या मंजुरीचा ठराव प्राप्त करुनच अशी प्रकरणे शासनास मान्यतेसाठी सादर करावीत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१७०१०६१७०४०५२६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil S Kothekar

Digitally signed by Sunil S Kothekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=c55205ca6d1113bfaec735bd2d1c5326d6b007c5cd3a46a6e4c4857e58ad2afe, cn=Sunil S Kothekar
Date: 2017.01.06 17:14:08 +05'30'

**( सुनिल कोठेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई-३२
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. मंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
४) मा. राज्यमंत्री (महसूल), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई-३२.
६) प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, यांचे स्वीय सहायक
७) सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमी अभिलेख, पुणे.
९) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.

११) सर्व विभागीय आयुक्त / सर्व जिल्हाधिकारी.
१२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१३) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
१४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१५) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१६) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
१७) सर्व सहसचिव / उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१८) सर्व "ज" समूह कार्यासने, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) निवड नस्ती (कार्यासन ज-१)

RNI No. MAHENG/2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष २, अंक ३७] मंगळवार, जून १४, २०१६/ज्येष्ठ २४, शके १९३८ [पृष्ठे २, किंमत : रुपये २७.००

### असाधारण क्रमांक ६०

### प्राधिकृत प्रकाशन

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

**OFFICE OF THE GOVERNOR OF MAHARASHTRA**

Raj Bhavan, Malabar Hill, Mumbai 400 035,
dated the 14th June 2016

*PREAMBLE*

CONSTITUTION OF INDIA.

No.RB/DB/e-11019(89)(2013)/850/2016.— Whereas, under sub-paragraph (1) of Paragraph 5 of the Fifth Schedule of the Constitution of India, the Governor may, by public notification direct that any particular Act of Parliament or of the Legislature of the State shall not apply to a Scheduled Area or any part thereof in the State or shall apply to a Scheduled Area or any part thereof in the State subject to the exceptions and modifications specified in the notification ;

And whereas various steps are required to be taken to ensure that in Scheduled Areas, tribal land alienation does not take place due to economic duress, fraud or forgery ;

And whereas the Panchayats (Extension to the Scheduled Areas) Act, 1996 (PESA, hereinafter) recognises the centrality of Gram Sabha in decision making about the various rights guaranteed under the said Act ;

And whereas Section 4 (m) (iii) of PESA gives to the Gram Sabha the "power to prevent alienation of land in the Scheduled Areas and to take appropriate action to restore any unlawfully alienated land of a Scheduled Tribe" ;

And whereas it is expedient to bring the state revenue laws in line with Section 4(m) (iii) of PESA, 1996 ;

And whereas it is expedient to modify the Maharashtra Land Revenue Code, 1966 to achieve the above purposes ;

The following notification shall come into effect from the date of its publication in the *Official Gazette* :—

*NOTIFICATION*

CONSTITUTION OF INDIA.

In exercise of powers conferred by sub paragraph (1) of Paragraph 5 of the Fifth Schedule to the Constitution of India, the Governor of Maharashtra hereby directs that Section 36 A of the Maharashtra Land Revenue Code, 1966, in its application to the Scheduled Areas of the State Of Maharashtra shall apply with the following modifications :—

"(*i*) after the first proviso in sub-section (1) of Section 36A, the following proviso shall be inserted, namely :—

"Provided further, that in villages in Scheduled Areas of the State of Maharashtra, no such sanction allowing transfer of occupancy from tribal person to non-tribal person shall be accorded by the Collector unless the previous sanction of the Gram Sabha under the jurisdiction of which the tribal transferor resides has been obtained.";

(*ii*) in sub-section (*4*), after the words " any person interested in such occupancy, " the words " or on a resolution of the Gram Sabha in Scheduled Areas" shall be inserted."

CH. VIDYASAGAR RAO,
Governor of Maharashtra.

Raj Bhavan, Malabar Hill,
Mumbai 400 035.
Dated the 14th June 2016.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

B. VENUGOPAL REDDY,
Secretary to Governor.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.